GR-20040806172910001-1201

विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/निवृत्ती वेतनावर देण्यात येणा-या व्याज दरामध्ये वाढ करण्याबाबत आणि विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या कुटुंब निवृत्ती वेतनावर व्याज देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक : पीईएन १०९४/प्र.क्र. ४८७/१७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १८ जानेवारी, २०००

**प्रस्तावना :-**

विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/ निवृत्ती वेतनावर देण्यात येणा-या व्याजाचे प्रदान महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ मधील नियम १२९ (अे) व (बी) च्या तरतूदीनुसार विनियमित केले जाते. विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/निवृत्ती वेतनावर देय असलेल्या व्याजाच्या दरात वाढ करण्याबाबत तसेच कुटुंब निवृत्ती वेतनावर व्याज देण्याबाबत शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १०९४/१५५/सेवा-४, दिनांक २४ एप्रिल १९९५ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर आदेशानुसार सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/ निवृत्ती वेतन व कुटुंब निवृत्ती वेतनाच्या प्रत्येक प्रकरणावर मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी स्वाधिकारे विचार करुन संबंधित प्रकरणी विलंब हा प्रशासकीय कारणांमुळे झाला. याबद्दल खात्री केल्यानंतर विभागाने यथास्थिती महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यांच्याकडून अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करुन घेऊन व्याज प्रदान करण्याबाबतचे आदेश आहेत. जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या संदर्भात शासन पत्र क्रमांक पीईएन १०९५/सीआर १२३/१७, दिनांक १० जानेवारी १९९६ अन्वये व्याज प्रमाणित करण्यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी हे सक्षम अधिकारी असल्याबद्दल कळविले असून, त्यांचा अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करुन घ्यावयाचा आहे. तथापि, शासकीय कर्मचारी जिल्हा परिषदांकडे अंतिमरित्या वर्ग झालेले असल्यास अशा प्रकरणी मात्र यथास्थिती शासन निर्णय वित्त विभाग दिनांक २४ एप्रिल १९९५ नुसार तरतूदी लागू राहण्याबद्दल कळविले आहे. अशा प्रकरणी व्याजाच्या वसूलीबाबतची जबाबदारी संबंधित विभाग प्रमुखांवर टाकण्यात आली असून, परिणामकारक नियंत्रण ठेवण्यासाठी विभागीय आयुक्तांनी प्रत्येक निरीक्षणात याबाबत पहाणी करण्याबद्दल व अहवाल शासनास पाठविण्याबाबत नमूद केले आहे. प्रशासकीय विभागांना वित्त विभागाने प्रदान केलेले याबाबतचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान करण्याबाबत शासन स्तरावर विचार चालू होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/ निवृत्ती वेतन/ कुटुंब निवृत्ती वेतन यावरील व्याज मंजूर करण्याबाबत प्रशासकीय विभागास असलेले जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या बाबतचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान करण्याबाबतचा शासनाने

निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या बाबतीत प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासकीय कारणांमुळे पडला आहे. याबद्दल विभागीय आयुक्तांची खात्री झाली असेल तर ते जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडून या संबंधातील अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करुन घेऊन व्याजाचे प्रदान करतील. मात्र शासकीय कर्मचारी जिल्हा परिषदांकडे अंतिमरित्या वर्ग झालेला असल्यास अशा प्रकरणी मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : सेनिवे १०९४/१५५/सेवा ४, दिनांक २४ एप्रिल १९९५ मध्ये नमूद केल्याप्रमाणे देय व्याज प्रमाणित करुन विभागीय आयुक्तांकडे प्रस्ताव पाठवावा व सदर प्रस्तावास विभागीय आयुक्त, महालेखापाल कार्यालयाकडून अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करुन घेऊन संबंधितांच्या प्रकरणी व्याजाचे प्रदान करतील.

विभागीय आयुक्तांना जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या बाबतीत विलंबाने अदा झालेल्या रकमेवर व्याज अदा करावयाचे अधिकार प्रदान करण्यात आल्यामुळे त्यांनी व्याज मंजूरीनंतर अशा प्रत्येक प्रकरणी शासनाची कार्योत्तर मंजूरी घ्यावी.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२६७२/सेवा-७, दिनांक ८ ऑगस्ट १९९८ व क्रमांक २४८/९९/सेवा-४, दिनांक १.१०.१९९९ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. ला. भोई )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
मुख्य लेखा परीक्षक , स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
वित्त विभाग (सेवा-७), मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती, कार्यासन क्रमांक १७.